# कालिदासचातुर्य नाटक.

हें पुस्तक

**वामन गोपाळ केळकर**

यांणीं केलें तें वेंगुर्लें येथें

**विठ्ठल गोविंद बाणावलीकर**

यांणीं आपल्या मालु० समा० छा० छापिलें

आवृत्ति दुसरी.

सन १८८९.

किंमत Rupees two

# कालिदासचातुर्यनाटक.

## नांदी

### गीति.

जय जय करुणासिंधो, जय जय बंधो जगत्प्रभो देवा ॥
त्वन्नामस्मरणरसीं, दे मज रुचि मी न मागतों ठेवा ॥१॥

( अशी नांदी झाल्यावर सुत्रधार पुढें होऊन म्हणतो :- )

पुरे पुरे, इतकें मंगलाचरण पुरे आहे. मला पुढें श्रीहरिहरेश्वराच्या आज्ञेप्रमाणें वर्तावयाचें आहे. ( कांहीं ऐकिलेंसें करून ) काय म्हणतां? " आज्ञा कोणाची? " तर सांगतों ऐका.

### गीति.

असतां सुखशय्येवरि, विप्र वदे एक येउनी मजला ।
" हे बालका असे बहु, नाट्याचा छंद वाटतो तुजला ॥२॥
तरि या शिवरात्रीच्या, महोत्सवीं या सभेसि तूं दावीं ।
प्रख्यात कविशिरोमणि— कौतुक यत्कीर्ति या जगीं गावी ॥३॥
जातों मी समज मला, तूंचि मनीं कोण तो " असें वदुनी ॥
पावे अंतर्धाना, जागृत झालों तयीं असें बघुनी ॥४॥

म्हणून आतां नव्या कार्यास आरंभ केला पाहिजे. ( पडद्याकडे पाहून ) मित्रा पारिपार्श्वका, चल लवकर. ( पारिपार्श्वक येतो. )

पारि०— मित्रा! हें पहा एक पत्र आलें आहे. ( पत्र देतो. )

सूत्र०— ( वाचतो. ) " स्वस्तिश्री मित्र भरतराज यांस— कल्हार पुरनिवासी मित्र सुरेंद्रनाथ यांचे शिरसाष्टांग नमस्कार विनंति विशेष. पत्र लिहिण्यास कारण कीं, हल्लीं महाराजपुरांत शिवरात्रीचा महोत्सव असल्याकारणानें आम्ही इकडून एका नाट्याचा साभिनय खेळ शिकून एक नट गण पाठविला आहे तरी तेथील विद्वद्वंदाच्या कसोटीस हा कसा काय उतरतो तें पहावें. नाटक कोणतें म्हणशील तर—

गीति.

पूर्वी कवीश झाला, नाम जया कालिदास हें आहे।
यत्कीर्ति या धरेवरि, विष्णुपदी सदृश उज्वला राहे॥१॥
तत्कनुरता नटी ज्या, नाट्यीं विलसे सभेंत जशि रंभा॥
शिकवुनि ते साभिनय, धेषीं करण्यास नव्य आरंभा॥२॥

आतां हें नाटक कोणी रचिलें म्हणशील तर—

गीति.

जो प्रांत परशुराम— क्षेत्राभिद पश्चिमे जया सिंधु।

मर्यादा होय तिथें, वास करी वामनाख्य जो बंधु ॥ ७ ॥
तेणें रचोनियां हें, समर्पिलें मत्करीं कथोनि असें ॥
मन्मित्रत्वाची हे, खूण तुला मी सदैव देत असें ॥ ८ ॥

मित्रा पारिपार्श्वका! काय आनंदाची गोष्ट घडून आली पण!! अरे ज्या प्रकारच्या खेळाविषयीं मी विचारांत पडलों होतों; व मजकडून ईश्वराची आज्ञा सिद्धीस जाते किंवा नाहीं या विवंचनेंत पडलों होतों; त्या प्रकारचा खेळ या प्रसंगीं आयता आला तेव्हां किती म्हणून आनंद सांगावा!!

पारि० — मित्रा! मलाही तसाच मोठा हर्ष झाला आहे; व त्या नाटकाचा प्रयोग करण्याविषयीं मोठें कौतुक वाटत आहे.

सूत्र० — अरे पहा. मित्रासारखी दुसरी वस्तु या जगांत मिळणार नाहीं. एकदां शंकराचार्यास मंडनमिश्रांनीं असा प्रश्न केला कीं "विश्वस्मिन्का सुखावहा?" म्हणजे सगळ्या जगांत सुखकारक पदार्थ कोणचा? तेव्हां आचार्यांनीं उत्तर केलें "मैत्री" म्हणजे मैत्री ही सगळ्या जगांत अत्यंत सुखकारक होय. आतांच पहा. मला पहिल्यानेंच काळजी जाणूनच जणुं सुरेंद्रनाथानें हा नटवर्ग पाठविला आहे. यावरून मित्र हे दूर असून परस्परांचें मनोगत जाणतात यांत संदेह नाहीं.

पारि०_ खरेंच मित्रा! पहा कीं, चंद्र देखील फार दूर अंत-
रावर असून जरी मेघांनीं आच्छादित असला तरी कुमुद वनां
विषयींची प्रीति टाकीत नाहीं.

सुत्र०_ बरें तर तूं मला साह्य ऐस. मी खेळास आरंभ करितों.

( इतक्यांत पडद्यापलिकडून भालदाराची ललकारी ऐकूं येते. "राजाधिराज!! श्रीमच्छत्रपति भोजराज महाराज!! -
आस्ते कदम नजर रखे )

मित्रा, आतां भोजराजाची स्वारी न्यायासनावर बसण्या-
करितां येत आहे. तर चल आपण पुढील तयारीस लागूं. ( अ-
से म्हणून दोघे जातात. )

( हा कथा प्रवेश झाला. )

( पुढें भालदार ललकारत आहे, व मागें परिवार, प्रधान,
कालिदासादि नऊ कवि रत्नें व इतर सभासद आहेत असा
राजा प्रवेश करितो. )

भाल०_ ' राजाधिराज; ' इत्यादि पूर्वोक्त म्हणतो. ( राजा
प्रधान वगैरे मंडळी यथास्थानीं बसल्यावर )

राजा:_ प्रधानजी!

प्रधान. राजाधिराज! काय आज्ञा आहे.

राजा:— अहो काल जो एका ब्राम्हणानें अर्ज आणला होता, त्याचा आज निकाल झाला पाहिजे; कारण त्यास आजचें वचन दिलें आहे. तर त्या ब्राम्हणास घेऊन येण्याविषयीं सेवकास आज्ञा करा.

प्रधान:— आज्ञेप्रमाणें करितों.— अरे कोण आहे रे तिकडे? त्या यज्ञसेन ब्राम्हणास बोलावून आण.

दूत:— (रामराम करून) आज्ञा महाराज. (जाऊन त्यास घेऊन येतो.) यावें महाराज. असें वदावें.

ब्रा०— (राजास पाहून आशीर्वाद देतो.) विजयस्व राजन्! हे नरश्रेष्ठा!

गीति.

राजा! या पृथ्वीवरि चिरकाल असो तुझें सुखद राज्य॥
त्वच्चरित जना रुचि दे, तेंवि न देतें तयास सासिताऽऽज्य॥

राजा:— तथास्तु. या आसनावर भटजी महाराज बसावें. (भटजी बसतात.)

प्रधान:— भटजी! आपला काय अर्ज आहे?

यज्ञसेन:— हा पहा या कागदावर लिहून आणिला आहे. तो राजाधिराजांस वाचून दाखवावा.

**प्रधान**— ( त्याचे हातून अर्ज घेऊन वाचतो. )

**श्री:**

श्रीमन्महाराजाधिराज गोब्राम्हण प्रतिपालक, वैदिकधर्मसं- रक्षक, विद्वद्वृंदभूषण भोजराज महाराज यांचा कृपाश्रित

यज्ञसेन भट्ट बिन् सोमदत्त भट्ट यांचा अर्ज विक्रम संवत ११५० माहे चैत्र शुद्ध ३ रोज शुक्रवार चा ऐसाजे. माझा पुत्र देवदत्त कांहीं दिवसांपूर्वी गांवास गेला होता, तो थोड्याच दिवसांनीं परत आला. पुढें आणखी थोडे दिवस गेल्यावर माझे घरीं माझे पुत्रासारखाच एक मनुष्य आला, त्याच दिवशीं माझी सुन माहेराहून परत आली. तेव्हां हे दोन सारखे मनुष्य पाहून आम्ही सर्व मोठ्या काळजींत पडलों. तेव्हां या दोहोंपैकीं खरा कोणता, याचा निर्णय करावा म्हणून भोंवतालचे चार शहाणे गृहस्थ जमवून त्यांनीं व मी त्या दोघांस कांहीं खुणेच्या गोष्टी पृथक् पृथक् विचारल्या पण त्यांचीं उत्तरेंही त्या दोघांनीं एकसारखींच दिलीं. तेव्हां राजाधिराजापाशीं हा अर्ज केला आहे. तरी माझा खरा पुत्र कोणता याचा निकाल ह्या दरबारीं होऊन मला व त्या माझ्या दीन झालेले सुनेला संकटांतून मुक्त करण्याचें श्रय प्रभु घेतील अशी आशा बाळगून —

आलों आहें " ( सर्व सभासद चकित होतात. )

राजा-— भटजी ! होय असाच तुमचा अर्ज आहे ?

यज्ञ०— होय राजाधिराज असाच आहे.

राजा-— ( मनांत ) मोठी अलौकिक व अपूर्व गोष्ट आहे खरी. असो. ( उघड ) प्रधानजी ! या भटजींच्या पुत्र म्हणविणाऱ्या दोघांस बोलावणें पाठवून आणवा.

प्रधान-—आज्ञेप्रमाणें करितों.

राजा-— भटजी, तुमच्या दोन पुत्रांपैकीं तुमच्या मतें खरा कोणचा वाटतो ?

यज्ञ०— माझे मतें प्रथम आलेला खरा व मागून आलेला लबाडीचा असावा. पण असें तरी खात्रीनें सांगवत नाहीं, कारण त्या उभयतांनीं खाणाखुणा एकसारख्या सांगितल्या.

( भालदार पुकारतो. )

प्रधान-— कोण आहे रे ?

भाल०— सारख्या स्वरुपाचे दोघे ब्राम्हण दरबारांत येण्याची परवानगी मागत आहेत महाराज ?

प्रधान-— त्यांस लवकर आंत घेऊन ये. ( दोघे जातात. )

( सर्व सभासद त्यांस पाहून चकित होत्साते परस्परांकडे-

आश्चर्य मुद्रेनें अवलोकन करितात.)

**दोघे ब्राम्हण:—** राजा विजयी हो. ( हात वर करून आशीर्वाद देतात व डोळे वटारून एकमेकांकडेस पहातात.)

**राजा:—** यावें भटजी महाराज बसावें. ( मनांत ) काय चमत्कार आहे! जसे कांहीं जुवळे दोन पुत्र असावे तसे एकसारखे दिसत आहेत!! ( उघड ) भटजी, पुत्र किती वयाचे सुमारें झाला याबद्दल कांहीं स्मरण आहे?

**यज्ञ.—** छे! महाराज अशी गोष्ट मुळींच नाहीं. आज इतकीं वर्षें मी एकाचेंच पोषण करीत आहें. आतां जन्मतःच यांपैकीं नाहींसा झाला असेल असें म्हणावें तर त्यास दोन अडथळे येतात. जुवळ्या मुलांपैकीं आधीं जन्मलेला लहान व मागचा अमळ मोठा असतो, पण या दोघांत तसा भेद मुळींच आढळत नाहीं हा एक. व दुसरा यांपैकीं एक जर प्रथमच नाहींसा झाला असेल असें म्हणावें तर दोघांच्या सर्व खाणाखुणा सारख्या पडूं नयेत; पण हे दोघेही एकून एक गोष्टी अगदीं बरोबर सांगतात.

**राजा:—** ( मनांत ) आतां इतक्या हकीगती उपर या ब्राह्मणास खुणेचे प्रश्न वगैरे विचारण्यांत कांहीं अर्थ नाहीं; तर आतां

यांचें म्हणणें तरी काय? तें पहावें- ( उघड ) प्रधानजी, या दोघांस निरनिराळ्या ठिकाणीं नेऊन मी सांगतों हे प्रश्न विचारा व त्यांचीं उत्तरें टांचून घ्यावीं- ( असें म्हणून त्याचे कानांत प्रश्न सांगतो- ) ( प्रधान जाण्यास निघतो- )

**न्यायाधीश**:— राजाधिराज! माझी एक विनंती आहे कीं, या चमत्कारिक खटल्याची येथेंच चौकशी व्हावी, असा सर्वांचा मनोदय आहे- तर प्रधानजींनीं यांपैकीं एकास अन्यत्र नेऊन प्रश्न विचारावे, व एकास खावंदांनी येथें सर्वांदेखत विचारावे-

**राजा**:— वाः! असें असेल तर आम्ही फार खूष आहों-

( प्रधान त्या दोघांपैकीं जो मायावी होता त्यास घेऊन जातो)

**राजा**:— भटजी, आतां मी तुम्हास प्रश्न करितों त्यांचीं उत्तरें सत्यास स्मरून द्या-

**देवदत्त**:— परमेश्वरास स्मरून सत्य असेल तेंच सांगेन-

**राजा**:— ही स्त्री ( तिकडे बोट दाखवून ) कोणाची आहे?

**देव०**— ही माझी आहे- याबद्दल मी महाराज सांगतील ती शपथ करीन-

**राजा**:— या अर्जांत लिहिलें आहे कीं, तुम्ही गांवास गेलां

होतां, तर कोणाच्या कामाकरितां गेलां होतां?

देव०— आमचें कांहीं येणें एका गृहस्थाकडे होतें, त्याच्याउ-गवणीकरितां मला माझ्या बापानें पाठविलें होतें.

राजा:— मग तेथें तुमचें काम झालें अगर नाहीं?

देव०— नाहीं.

राजा:— तर मग तुम्ही तेथून कोणीकडे गेलां?

देव०— तेथून घरीं येण्यास निघालों.

राजा:— तुम्ही घरीं आलां तेव्हां तो दुसरा मनुष्य कोठें होता?

देव०— मी येण्यापूर्वींच तो घरीं आलेला होता.

यज्ञ०— (मध्येंच) महाराज! हा जर माझा खरा पुत्र, तर मग इतके दिवस कोठें दडून राहिला होता? यावरून हा कोणी तरी कपटवेषधारी असावा.

राजा:— यावर तुमचें काय उत्तर आहे?

देव०— मला वाटेंत कांहीं दुखणें लागलें याकरितां बरा होईपर्यंत एका गांवीं राहिलों होतों, म्हणून घरीं येण्यास पुष्कळ दिवस लागले. मी घरीं येऊन पहातों तों हा दुसराच कोणी तेथें आहे. त्यास पहातांच मला अशी भ्रांति पडली कीं हा—मी! कीं तो मी! पण महाराज! मजपेक्षां त्याणें माझे

मातापितरांस फारच मोह पाडिला !! ते मी खरा पुत्र असून - माझा धिःकार करितात व त्या धूर्त वंचकास जवळ करितात !!

राजाः— तुम्ही घरीं आल्यावर तुमचें व त्याचें कांहीं बोलणें चालणें झालें ?

देव०— मी घरांत आल्यावर मला पहातांच तो दांत ओंठ चावूं लागला तेव्हां त्याचें व माझें कडाकडीचें भांडण झालें-पण तो पुढें आपल्या जादूचें सामर्थ्य चालवून माझा पाडाव करूं लागला- तेव्हां मी गायत्री मंत्राच्या जपानें त्याचें कांहीं चालूं दिलें नाहीं- त्यानें जादूनें उत्पन्न केलेले राक्षस, भूतें, यक्ष वगैरे नाना तऱ्हेनें मला उचलून नेण्याचा यत्न करीत, पण जसा जसा मी मोठ्यानें मंत्रजप करीं तसतसे ते निर्बळ होऊन परत जात-

राजाः— यावरून तुमच्या मतें तो मोठा जादुगार आहे ?

देव०— होय महाराज ! मोठा जबरदस्त जादुवाला आहे-

( इतक्यांत प्रधान त्या मायावी देवदत्तास घेऊन येतो- )

राजाः— ( खऱ्या देवदत्तास उद्देशून ) तर तुम्ही ही आपली स्त्री घेऊन जा-

मायावी देव०— ( त्वरेनें राजाकडे वळून ) हं हं महाराज ! ही

माझी स्त्री आहे- हित्स मी ह्यास हात देखील लावूं देणार नाहीं; ह्या दुष्ट कपटी जादुगार आहे-

देव०__ अरे दुष्टा! ब्राम्हणछळका! मानवपशो! असें परस्त्री अभिलाषानें घोर कर्म करण्यास तुला लज्जा रे कशी वाटत नाहीं?

मायावी देव० ( क्रोधानें डोळे लाल करून ) जारे नरोडया! तुला तपोबलानें नाहींसा करून टाकीन- दुष्टा कपटानें माझें- सर्वस्व हरण करण्यास इच्छितोस?

( सर्व सभासद सखेदाश्चर्य त्या दोघांकडेस पहातात- )

कालिदास:__ ( मायावी देवदत्तास अनुलक्षून ) अरे असा पिशाचासारखा खवळतोस काय? क्रोधाध होणें हें कांहीं ब्राम्हणाचें लक्षण नाहीं-

मा० देव०__ ( मनांत ) अरे काय! याणें मला ओळखलें काय? अथवा हा उगाच शब्दांचा सारखेपणा भासला असावा- ( उघड ) काय रे थेरड्या? कोणास रे पिशाच म्हणतोस? लाज नाहीं वाटत?

सभासद:__ ( आपणांशी ) हाच गुलाम कपटी आहे- याची-पुरीं शंभर वर्षें भरलीं-

का०_(मनांत)हा खराच पिशाच आहे- येरवीं हा इतका चिढला नसता-

मायावी:— ( आपल्याशीं ) असो. एकूण याणें मला ओळखलें नाहीं.

राजा:— प्रधानजी, याचे जबानीचे कागद आणा पाहूं. अहो! तुम्ही दोघे गप रहा. ( प्रधान राजाजवळ कागद देतो. ) ( राजा वाचून ) काय आश्चर्य! सर्व जबानी अक्षरशः सारखी आहे!! एक मात्रा कीं काना देखील कमजास्त नाहीं. ( अमळ विचार करून मनांत ) बरें मग ह्या दोघांच्या येण्यांत अंतर कां पडलें? ( पुनः विचार करून ) त्यांत कांहीं बुद्धि शिरत नाहीं. तर आतां ह्या आमच्या सभेच्या सभासदांतून कोणाची कुशाग्र बुद्धि आज या गोष्टीचा निकाल करते पाहूं. ( एक आज्ञापत्र लिहितो. ) प्रधानजी, हें पत्र समस्तांस वाचून दाखवा. ( सर्व सभासद चित्त देऊन ऐकण्याविषयीं उत्कंठित होतात )

प्रधान:— ( हातीं घेऊन वाचतो. ) " आज्ञापत्र समस्त राजकार्यधुरंधर विश्वासनिधि राजमान्य राजश्री अष्टप्रधान, समस्त कविवृंद आणि समस्त सभासद यांस कळविलें जातें कीं, आज या दरबारीं आलेला महत्त्वाचा न्याय समस्तांनीं श्रवण केलाच आहे. तर याचा योग्य निवाडा ज्याच्या बुद्धीस सुचेल त्याणें करण्याविषयीं सर्वांस परवानगी आहे. सबब जो ज्ञाता या का

मास तयार असेल त्याणें सत्वर उठून न्यायाधिशाचें स्थान स्विकारावें" ( सर्व सभासद चकित होऊन एकमेकांकडे पहाता त व कोणीही पुढें सरण्यास धजत नाहीं असें पाहून )

**कालि०**__ ( मनांत ) आदिशक्तीच्या प्रसादानें आज हा समय प्राप्त झाला आहे- ( उघड ) हे राजाधिराज! आपली कृपादृष्टि असल्यास हा आश्रित आपल्या बुध्यनुसार या खटल्याचा निकाल करील-

**दिङ्नागाचार्य वगैरे प्रतिपक्षी**__ ( एकमेकांच्या कानी लागून ) आतां कालिदास काय प्रकाश पाडतो पाहूं - अहो, जेथें प्रत्यक्ष राजा, अष्टप्रधान, व न्यायाधीश यांणीं हात टेंकले तेथें याची ती अक्कल काय न्याय निवडणार? पण असो - होतें आहे तसेंच होऊं दे- परस्परच चांगली फजिती होऊन त्याची खोड मोडूं दे - म्हणजे इतक्या तोऱ्यानें वागतो तें सर्व आपोआपच बंद होईल-

**राजा**__ ( आनंदानें ) कविशिरोमणे, तसें झाल्यास आम्हास परमानंद होऊन आज या भोजसभेन्चें आपण नांव राखिलेंसें होईल-

**दिङ्नागाचार्य वगैरे प्र०**__ ( मनांत ) राजासुद्धां हा भ्रम-

आहे.

इतर सभासद :— सरस्वतिकंठभूषणा, कविश्रेष्ठा, आम्ही आपल्या कीर्तीचा जयघोष करूं.

(हें इतर सभासदांचें व राजाचें भाषण ऐकून दिङ्नागाचार्य वगैरे प्रतिपक्ष्यांस फार वाईट वाटतें व खिन्न होतात.)

कालि०—(न्यायासनावर बसून) प्रधानजी, खटल्याचे सर्व कागद व दोघे आरोपी समोर आणा.

(ते दोघे पुढें होतात व प्रधान कागद देतो.)

कालि.— तुम्हा दोघांस लिहितां येतें ?

दोघे.— होय. (सर्व सभासद उत्कंठेनें पहात रहातात.)

कालि०— तर तुम्ही मी जे लेखी प्रश्न करितों त्याचीं उत्तरें लिहून द्या.

मायावी देव०—(जरा घाबरून) बरें आहे महाराज, करावे प्रश्न

कालि०— (“तुझें उपनयन कधीं झालें?” हा प्रश्न दोन कागदांवर लिहून त्यांजपैकीं प्रत्येकाजवळ देतो.)

दोघे:— (एकमेकांजवळ कोणाचें पाहून आपापल्या कागदावर नवव्या वर्षी झालें असें लिहून देतात. अशा रीतीनें चार पांच

प्रश्नांची सारखीच उत्तरें आल्यावर )

**कालि०**— ( मनांत ) ह्या ठिकाणी खरोखर पिशाच्चाचा संबंध असला पाहिजे. येरवीं अशा गोष्टी होणें नाहींत. बरें आतां असें करून पाहूं. ( उघड ) प्रधानजी, यज्ञसेनाच्या सुनेस बोलावून आणा. ( ती येते तिला ) हे साध्वी! ह्या दोन पुरुषांपैकीं तुझा खरा पति तुला कोणचा वाटतो?

**स्नुषा**:— हे तात! माझ्यानें तें सांगवत नाहीं.

**कालि०**— ( दोघा आरोपींस ) "ही स्त्री आपली आहे" असें सिद्ध करण्यास तुम्ही काय काय करूं शकाल?

**दोघे**:— ( घाबरून ) सांगावी तर आधीं. मग पाहूं.

**कालि०**— ही माझे हातांत झारी आहे. हिचे तोंडांत प्रवेश करून तोटीवाटे बाहेर पडावें असें जो करील तो ह्या स्त्रीचा खरा नवरा असें समजतें जाईल.

**देवदत्त**:— ( दीनमुद्रेनें ) महाराज! हें माझेकडून होणें दुर्घट आहे. ( वर डोळे करून ) परमेश्वरा! काय अन्याय होत आहे!! काय ब्राम्हणाचा छळ हा!!!

**मायावी**:— होय, ही गोष्ट मी करितों. मग तर कोणास संशय रहाणार नाहीं ना? ( त्या स्त्रीकडे साभिलाष पहातो )

( सर्व सभासद आपापल्या ठिकाणीं थक्क होतात )

**कालि०** — ( झारी पुढें ठेवितो - तो मायावी आंत शिरल्यावर प्रधान कालिदासाच्या खुणेवरून झारीचीं दोनही छिद्रें बंद करितो - सर्व सभा आश्चर्यानें पहाते - ) पहा राजाधिराज ! हा कोणी पिशाच मायेनें या ब्राम्हणपुत्राचें स्वरूप धारण करून या गरिबास व्यर्थ छळीत होता, हें आतां स्पष्ट आहे - मनुष्यास कधीं असें रूपांतर करितां येणार नाहीं - म्हणून हा जो समोर उभा आहे हा या ब्राम्हणाचा खरा पुत्र होय - ( सर्व सभासद आनंदानें टाळ्या वाजवितात, व शाबास ! शाबास !! - असा एकच ध्वनि उठतो - प्रतिपक्षास दुःख होतें - ) आतां हा कोण व यानें असें कपटरूप कां धारण केलें याबद्दल आपणास शोध करणें अगत्याचें मी यास बाहेर काढितों पण - आपले मांत्रिक आधीं येथें आले पाहिजेत - ( प्रधानाचे हुकुमावरून मांत्रिक सभेंत येतात - ) हे मांत्रिकानों ! मी या झारींत कोंडलेलें पिशाच्च बाहेर काढितों - तुम्ही यास पाशबद्ध करण्यास सिद्ध असावें -

**मांत्रिक** — सिद्ध आहों -

**कालि०** — ( झारीचें तोंड खुलें करितो - तो बाहेर आल्यावर धृ-

दैवत स्वरूप धरितो . मांत्रिक त्यास लांदूळ आंगावर टाकून पाशबद्ध करितात. तो निसटून जाण्याचा यत्न करितो.) पहा सभ्य जन हो! मी सांगितल्याचा प्रत्यय आला कीं नाहीं? ( पिशाच्चास ) अरे तूं आपली सर्व हकिकत सांग. ( तो स्तब्ध रहातो. )

**मांत्रिक.—** ( आणखी तांदूळ मारून बोलता करितात. )

**राजा.—** वाः ! काय तरी मंत्रसामर्थ्य हे !!

**मायावी पिशाच्च.—** अरेरे !! ( दुःखाचे आळे पिळे देऊन ) आय आय! सर्व आंगास कळा लागल्या आहेत !! अरे मला सोडा ; मी आतां जातों.

**मांत्रिक.—** आधीं आपली हकिगत सांग, मग सोडतों.

**पिशाच्च.—** महाराज ! मी या ब्राम्हणाच्या घरापाठीमागील परड्यांत एका पिंपळावर रहात होतों. ( सर्व कान देऊन ऐकतात. )

**कालि.—** बरें मग पुढें ?

**पिशाच्च.—** एके दिवशीं ही या ब्राम्हणाची सुन न्हालेली असतां भर दुपारचे वेळीं त्या पिंपळाखालीं आली होती. तेव्हां मी तिला लुब्ध होऊन पछाडिलें. अरे! मेलों रे मेलों !!

( निसटून जाण्याकरितां ताडकर उडी मारितो व पुन्हा त-साच पडतो. )

कालि०— मग पुढें ?

पिशाच— त्या वेळीं हिचा हा भ्रतार गांवी गेला होता. ते-व्हां मी मायेनें हिच्या नवऱ्याचें स्वरूप धारण करून ही मा-हेरीं जावयास निघाली असतां तिजबरोबर मीही तिकडे गे-लों. पण तेथें एक कडकडित दैवत असल्यामुळें त्या ठिका-णीं माझें कांहीं चाललें नाहीं. म्हणून हिच्या सासरीं परत येऊन त्यास पिंपळावर हिच्या येण्याची वाट पहात बसलों. पुढील वृत्तांत आपणास माहितच आहे.

कालि०— आतां सुटून तूं कोणत्या ठिकाणीं जाणार ?

मांत्रिक— त्यास आतां आम्ही सोडणार नाहीं, गाडून टाकूं.

पिशाच— ( पायां पडून काकुळतीस येऊन ) मी सर्वस्वी तुमचे ताब्यांत आहें. मला गाडण्यापेक्षां एखाद्या क्षेत्रीं नेऊ-न सद्गति घाल तर या दुष्ट योनींतून माझी सुटका होईल.

कालि०— बरें आहे. मांत्रिक जन हो ! यास तुम्ही दुर्ग-तीस न पाठवितां सद्गतीप्रत न्या.

( मांत्रिक त्यास बाटलींत भरून राजा, कालिदास व इ-

तर सभासद यांस वंदन करून जातात.)

राजा:— (आनंदानें कालिदासास उद्देशून) वाहवा! वाहवा!! आज आमच्या सभेचा लौकिक आपण राखिला. आपण मोठे धन्य आहां.

(ही प्रशंसा ऐकून दिङ्नागाचार्य आदिकरून प्रतिपक्ष्यांस दुःख होतें.)

यज्ञसेन:— (आनंदानें) महाराज! ही आपली सभा, इंद्राची सभा जी सुधर्मा तिजप्रमाणें सर्वदा विजयी असो.

देवदत्त:— आणि हे चक्रवर्ति राजा! तूं देवेंद्राप्रमाणें, आणि हा तुझा कविश्रेष्ठ बृहस्पतिवत विजयी असो.

देवदत्ताची स्त्री:— (परमानंदानें) आणखी इंद्राणीप्रमाणें जी तुझी धर्मपत्नी तिला जयंतासारखा महा पराक्रमी पुत्र होऊन तुझ्या अंकास भूषण देवो.

राजा:— (आनंदानें) तथास्तु.

यज्ञसेन:— आतां आम्हांस जाण्यास आज्ञा असावी.

राजा:— प्रधानजी, या ब्राम्हणांस कांहीं अग्रहार देऊन यांची रवानगी करावी.

प्रधान:— आज्ञेप्रमाणें करितो. ( त्यांसह निघून जातो. )

( पडद्यापलिकडे भाट स्तुति करितात. )

पहिला:— श्लोक.

राजा प्रजा तव असे नयमार्गगामी ॥ धैर्यें गुणें सम परत्र त-शीच धामीं ॥ हे होय बा सुगुणदा तव नीतिजाती ॥ राजा गुणी तरि तशीच असे प्रजा ती ॥१॥

टीप:— १ न्यायमार्गानें जाणारी. २ दुसरे ठिकाणीं. ३ चांगले गुण देणारी. ४ न्यायाची

दुसरा:— श्लोक.

हे भोजराज ! दिनराज यशासि लावी ॥ कीर्ती तुझी बहु कलंक म्हणून गावी ॥ तो लोकबंधु आणि मित्र-हि सारसांचा ॥ तैसाच तूं परि नयांत सुमानसांचा ॥

तिसरा:— श्लोक.

नीतिज्ञ हें सुकविवृंद तुझ्या सभेंत ॥ बा शोभतें नृप-वरा स्वमनीं प्रशांत ॥ श्रेष्ठा तयांत परि ती नवरत्न-माला ॥ जी या सभेस नित भूषविते जगाला ॥

टीप:— १ सूर्य. २ पक्षी लोकांचा बंधू, सूर्य. ३ [illegible] चा किंवा सारस पक्ष्यांचा, पक्षी रसिकांचा. ४ [illegible]

मानस ज्यांचें अशांचा, साधूंचा- ५ नीति जाणणारे.
६ मनांत शांत- ७ एक पाठी नऊ पंडित-

चवथा:— **श्लोक-**

कोणी कवीश्वर तुझ्या जरि या सभेंत ॥ आणील वा
रचुनियां नव काव्य गीतें ॥ तें होय नूतन जरी नरि-
त्यास देशी ॥ तूं लक्ष संख्यें तयिं निष्क सुकीर्तिराशी

टीप:- १ कविता- २ गाणें- ३ एक लक्ष- ४ नाणें विशेष-
५ चांगल्या कीर्तीचा पुंज-

राजा:— वा:! ह्यांच्या या श्लोकांनीं मनाचा श्रम हरण क-
रून त्यांस नवी उमेद आणिली-

( प्रधान येतो व आसनावर बसतो. तों भालदार पुकारतो-

राजा:— प्रधानजी, कोण आहे चवकशी करा-

प्रधान:— भालदार! कोण आहे रे? कां ललकारी केली-
स?

भालदार:— महाराज! एक ब्राम्हण आला आहे तो-
आंत येण्यास परवानगी मागतो-

राजा:— सत्वर आंत आणा-

भालदार:— आज्ञा महाराज- (त्या ब्राम्हणास आंत घे-

ऊन येतो- )

ब्राम्हण:— विजयी भवराजन्

श्लोक -

हे एक पाठि नव पंडित संश्रयारे ॥ तूतें सदा कुशल चिंतिति लोक सारे ॥ कीर्ती तुझी परिसुनी नव दर्शनाला ॥ इच्छीत से स्वमनिं हा हित वा श्रयाला ॥

राजा:— तथास्तु नमावें महाराज ! आपण कोठून आलां

ब्राम्हण:— राजाधिराज ! मी आपल्या गुरूबरोबर पुष्पपुराहून आलों- माझे गुरू आपल्या दर्शनाची इच्छा करीत आहेत-

राजा:— ते कोठें आहेत ? त्यांचें नांव काय ?

ब्राम्हण:— ह्या आपल्या नगरांतील एका धर्मशाळेंत ते उतरले आहेत- त्यांचें नांव धनंजयाचार्य-

राजा:— प्रधानजी, सेवकांबरोबर पालखी पाठवून आचार्यांस सभेंत आणावें-

प्रधान:— आज्ञा- ( पालखी पाठवून त्यास सभेंत आणविलो ) ( धनंजय सभेंत येतांच त्यास सर्व उत्थापन देतात - )

राजा:— यावें आचार्य - या रत्नखचित आसनावर बसावें.

धनंजय:— ( बाहू उभारून ) राजन् विजयस्व विजयस्व !! अपिच शृणु-

### श्लोक-

सर्वदा सर्व दोसीति, त्वं मिथ्या कथ्यसे बुधैः ॥
नारयो लेभिरे पृष्ठं, नवक्षः परयोषितः ॥ अपिच ।
सरस्वती स्थिता कंठे, लक्ष्मीः करसरोरुहे ॥
राजेंद्र कुपिता कीर्ति स्तेन देशांतरं गता ॥

(टीप-) अर्थः— तूं सदोदित सर्व वस्तु देणारा असा आहेस अशी जी तुझी कीर्ति लोक गातात ती व्यर्थ आहे. कारण शत्रूस तुझी पाठ मिळत नाहीं व परस्त्रियास वक्षस्थळ मिळत नाहीं. म्हणजे तुझें शौर्य असें आहे कीं रणांगणीं तूं कधींच अपजय पावत नाहींस व स्वधर्मचारी आणि धर्मपत्न्येकनिष्ठ असा तूं आहेस. आणखी हे राजेंद्रा तुझ्या कंठाच्या ठिकाणीं सरस्वती वास करिते, व हस्त-कमलाचे ठिकाणीं लक्ष्मी वास करिते म्हणून सापत्न भावानें रागावलेली जी तुझी कीर्ति ती देशांतरास निघून गेली. म्हणजे तूं मोठा विद्वान् व मोठा दाता आहेस अशी तुझी कीर्ति देशोदेशीं पसरली आहे.

राजा :— ( संतोष पावून ) प्रधानजी! यांस शालजोडी, दुपेटा वगैरे उत्तम पोषाक देऊन यांची बडदास्त उत्तम रीतीनें ठेवण्याची तजवीज करा. यांस आपल्या पंडित मंडळांत जागा द्यावयाची.

प्रधान :— हुकुमाप्रमाणें तजवीज ठेवितों. ( त्यास पोषाक आणून देतो. ) ( भालदार ललकारतो ) कोण आहेरे?

भालदार :— एक अति दरिद्री ब्राम्हण आला आहे. राजदर्शनाची इच्छा करितो.

कारि० ( आपल्याशींच ) आम्हास भेटलेला तोच हा असावा असें वाटतें. बेट्यानें फार उशीर लावला.

राजा :— आंत येऊं दे. ( ब्राम्हण येतो. )

ब्राम्हण :— विजयतांदेवः ( असा आशिर्वाद देऊन पंचांत गुंडाळून ठेवलेली ऊंसाची कांडी काढून राजापुढें ठेवितो तों तीं जळाऊ लांकडें आहेत असें पाहून घाबरून आपल्याशींच म्हणतो. ) अरे कर्मा! हें रे काय? भिकाऱ्याचे पाठीं शनीश्वर!! करायाला जावें एक आणि होतें एक! आतां द्रव्य मिळणें एकीकडेच राहिलें पण शिक्षा मात्र मिळेल. त्या समर्थानें दिलेली कांडी पंचांत गुंडाळून ठेविली ती घेऊन ही ज-

लाऊ लांकडें कोणी वरें घातलीं असावीं ? ( दीनमुद्रेनें का-
लिदासाकडे पहातो. )

राजा— (क्रोधानें) कोण आहे रे शिपायी ? या अपमा-
नाबद्दल यास कैद करा. ( सर्व सभासद मनांत आश्चर्य पा-
वतात व राजाचे कोपशांतवनार्थ युक्ति पहातात पण सुचत-
नाहीं. )

कालि०— ( आपल्याशीं ) अरे ! हें आमच्या शिष्यांपैकीं
कोणा तरी चोराचें काम असावें. बरें असो. या ब्राम्हणाची-
सुटका करण्यास ही युक्ति बरी आहे. (उघड) राजाधिराजा!
त्या ब्राम्हणाकर कोपनसावा त्यानें यथार्थ केलें.

( राजा, धनंजय व प्रतिपक्षी दिङ्नागाचार्य आदिकरू-
न इतर सभासद हे आपापल्या ठिकाणीं विस्मय पावून क-
शावरून वरें हे यथार्थ म्हणतात असा आपल्याशींच विचा-
र करीत रहातात. )

राजा— आपण असें कशावरून म्हणता ?

कालि०— महाराज ! त्याणें जळाऊ काष्ठाच्या रूपानें आ-
पलें दारिद्र्य महाराजांपुढें मांडिलें आहे. तर त्यास जाळून-
टाकून ब्राम्हणास सुखी करणें हेंच राजाधिराजांस उचित

होय.

राजा:—( खुष होऊन ) आपण धन्य आहां, धन्य आ-हां कविराज !!

धनंजय:—( मनांत ) अरे येथें आमचीही डाळ शिजे-ऊशी वाटत नाहीं- असो आपण आपल्या बुद्धिकौशल्यानें ह्यास जिंकूं.

दिङ्नागाचार्य:—( आपल्याशींच ) अं: ! आजदेखील कालिदासाचीच दोनदां वाहवा झाली- मागें एक वेळ मी व का-लिदास असे दोघे राजाबरोबर शिकारीस गेलों असतां ए-का नदीच्या तिरीं पोंचलों- ती नदी खळाळत जात होती, तें पाहून राजानें प्रश्न केला कीं, " कविराज ! ही नदी इतका आ-क्रोश कां करिते ? " तेव्हां मला कांहींच सुचेना पण कालि-दासानें लागलेंच उत्तर दिलें कीं " महाराज ! ही लहानप-णींच आपल्या माहेराहून सासरीं जात आहे " म्हणून ति-ला इतकें वाईट वाटतें- " हें ऐकून राजा संतुष्ट झाला- पण मी जो वाद केला त्यावरून मजविषयीं कालिदासाचें मनांत वांकडें मात्र आलें, व मी त्याशीं स्पर्धा करितों असें त्यास वाटलें- तर ह्याचे हे कीर्तिरूप पंख लहान आहेत तोंच उप-

टून टाकले पाहिजेत नाहीं तर ही गोष्ट आम्हास फार ज-ड जाईल.

**कालि०**_ ( चेहऱ्यावरून त्या दोघांच्या मनोवृत्ति ताडून) राजाधिराज! तर ब्राम्हणाची योग्य संभावना करण्यास-आज्ञा व्हावी.

**राजा:**_ प्रधानजी, ब्राम्हणास यथेच्छ धन देऊन संतुष्ट करा.

**प्रधान:**_ आज्ञेप्रमाणें करितों ( तो ब्राम्हण व प्रधान जातात. )

**न्यायदंडधर:**_ ( धनंजयास ) हे आचार्य ! ह्या भोजसभेंत कोणी नवा श्लोक करून आणिल्यास त्यास सवा लाख सोन टाका बक्षिस मिळतो. पण आज पर्यंत असा-श्लोक आणून कोणी बक्षिस मिळविलें नाही ! व हा प्रभाव आमच्या ह्या नऊ कवि रत्नांचा आहे. तेव्हां आपण-( इतकें बोलतो आहे तोंच धनंजय मध्येंच बोलतो )

**धनंजय:**_ ( गर्वानें ) होय. आमची देखील अशीच प्रतिज्ञा आहे कीं, नवें पद्य म्हणून ठरूं द्यावयाचें नाहीं.

**कालि०**_ ( यांच्या गर्वाचा परिहार करण्यास ही संधि-

बरी आहे असें मनांत आणून ) तर आतां आजपासून पुढें नवा श्लोक ठरल्यास आपण काय कराल ?

**दिङ्नाग**— अहो काय कराल म्हणून काय पुसतां ? जें तुम्ही कराल तें आम्ही करूं.

**धनं०**— हो हो तसेंच आमचेंही मत आहे.

**कालि०**— ( हेच दोघे प्रतिपक्ष्याचे पुढारी आहेत असें जाणून ) ह्या सभेंत नवा श्लोक ठरला तर आम्ही काशी क्षेत्रीं जाऊन संन्यास घेऊं, अशी आमची प्रतिज्ञा आहे.

**दिङ्ना० आणि धनं०**— फार बरें आहे. हीच आमची देखील आहे. ( तिचा उच्चार करितात. )

**न्याय०**— राजाधिराज ! ही ह्या त्रिवर्गांची प्रतिज्ञा आपण श्रवण केली. ह्या प्रतिज्ञेप्रमाणें यांजकडून वर्तन न घडल्यास त्यास जामीन —

**राजा**— ( बुद्धिकौशल्य पहाण्याच्या हौसेनें ) हो हो यास काय हरकत आहे ? आम्ही जामीन आहों. यांस तसें करणें आम्ही भाग पाडूं.

( इतक्यांत चालदार सभा बरखास्त होण्याची वेळ आली असें पाहून सूचना करितो. )

राजा:— कंचुकी! रंगमहालाच्या मार्गानें चल. ( राजा उठतो, सभा बरखास्त होते. )

( पडदा पडतो. )

॥ इति पंडित त्रय प्रतिज्ञो नाम प्रथमांकः ॥

---

# अंक दुसरा.

पहिलें स्थळ:— धनंजय कवीचें घर, धनंजय व त्याचा एक शिष्य हे येतात. )

धनंजय:— ( आनंदानें ) आतां कालिदासाचें वर्चस्व कमी करण्याची युक्ति हातीं आलीच असें समजलें पाहिजे. ( विचार करून) येथील संप्रदायाप्रमाणें सर्व कवींचे ग्रंथ मला मिळाले आहेत त्यांत त्याचेही आहेतच तर आतां जरी कालिदासाचे ग्रंथांत कांहीं दोष नाहींत तरी सर्व ग्रंथ धुंडाळले असतां कांहीं अपशब्द व कांहीं अशुद्धें तर सांपडतील; मग ते लेखकांच्या चुकीचे कां असतना! आम्हास नांवें ठेवण्यास तर कारण झालें. तर आतां असा श्लोक करून राजाकडे पाठवावा. ( असें म्हणून राजाचे नांवचें एक पत्र लिहून त्यांत नवा श्लोक घालून राजाकडेस पाठविण्याकरितां आपल्या शिष्याचे हातीं देतो. ) अरे

सद्या, हें पत्र नेऊन राजवाड्यांत राजेसाहेबांजवळ दे, पण संभाळ हो, घाबरूबिबरू नको.

**शिष्य:—** गुरुजी! मला कांहीं येत नाहीं. मी तेथें कसा जाऊं?

**धनंजय:—** अरे तुला कांहीं येत नसलें तरी पत्र नेऊन देण्यास कांहीं अडचण नाहीं. मी सांगतों तसें कर. प्रथम राजास आशिर्वाद दे. मग पत्र दे.

**शिष्य:—** बरें आतांच जाऊं?

**धनंजय:—** होय. या वेळेसच जा.

**शिष्य:—** बरें तर जातों. (पत्र घेऊन निघून जातो.)

**धनंजय:—** आपणही आतां स्वकार्यास जावें. (निघून जातो.)

(इति प्रवेशकः)

स्थळ दुसरें:— बागेजवळील रस्ता. एक शिष्य हातांत फुलांची परडी घेऊन येतो.

**शिष्य:—** मला आतां लवकरच आचार्यांच्या देवपूजेकरितां फुलें नेली पाहिजेत. (पूर्वेकडे पाहून) अरे, दिवस बराच वर आला. (एका बागेंत शिरतो.) ही राजाची खासगी बाग. यांत येतांक्षणीच झाडांच्या दाट छायेमुळें नुकताच प्रातःकाळ

झाला आहे असें वाटूं लागलें. बागेच्या बाहेर ऊन किती भरवर लागत होतें, पण आंत पहा कशी शीतळ व गर्द छाया पसरली आहे! येथील राजा तरी आपल्या गुरुजींवर किती प्रीति करितो हो!! त्याणें आपले खासगत बगेंतील फुलेंही नेण्यास देखील त्यांस मोकळीक दिली आहे. बरोबर, आचार्य असेच गुणी आहेत. रत्नाची परिक्षा रत्नपरिक्षकाशिवाय होणें नाहीं. पहा मी व गालवानें काल त्या ब्राम्हणाच्या पंचांत थट्टेनें लांकडें बांधून ठेविलीं, पण गुरुजींची बुद्धि काय अचाट आहे! त्यांणीं त्यांत देखील युक्ति लढवून त्या ब्राम्हणाचें कल्याण केलें. (परडीकडे पाहून) हें पुष्पभाजन अर्धें भरलें. आणखी थोडीं फुलें तोडून जावें. (तोडूं लागतो.) अरे तीं तिकडे गुलाबाचीं फुलें कशीं टवटवीत दिसत आहेत! नवीनच तीं आहेत. जुई, मालती, बटमोगरा यांचीं वसंतामुळें बहर येऊन विकसलेलीं फुलें फारच रमणीय दिसत आहेत. (पुढें जाऊन त्यांतलीं कांहीं तोडून) अरे हे चंपक, बकुळ, पारिजातक, आम्रवृक्ष किती तरी घमघमाट सोडीत आहेत, व ते भ्रमरांच्या गुंजारवानें जणूं मला बोलावीतच आहेत असें वाटतें तर त्यांकडे जाऊन त्यांनाही [illegible]. (अम-

ळ पुढें जाऊन ) वाः! वसंतभरानें आम्र वृक्ष तरी किती मोहरानें व्यापिले आहेत हे!! ( पुनः परडीकडे पाहून ) आतां फुलें पुरे आहेत, थोडीं कमळें तोडून घ्यावीं आणि जावें- ( बागेंतील जळाशयाकडे जातो ) वाहवा! येथें तर कांहीं अद्वितीयच शोभा फांकली आहे - हे पहा हंस, सारस, बक इत्यादि पक्षी कसे आपापल्या उद्योगांत निमग्न आहेत, चक्रवाक पक्षी सूर्य उगवल्यामुळें आपल्या सहचरीस शोधीत आहेत, व कांहीं त्यांसह आनंद करीत आहेत-(तळ्यांतील कांहीं कमळें तोडून जावयास निघतो-) - अरे वाः! आज तर फुलांची रगाडी झाली - आज मला खरोखर गुरुजी मोठी शाबासकी देतील- ( हर्षानें बागेच्या बाहेर पडतो - इतक्यांत दुसरा एक शिष्य येतो-)

दु॰ शिष्य.— आतां हें पत्र नेऊन राजवाड्यांत दिलें पाहिजे- पण मला राजवाडा ठाऊक नाहीं - बरें येथें कोणास तरी विचारून पाहूं म्हणजे समजेल - ( पहिल्या शिष्याकडे पाहून ) नमस्कार हो नमस्कार! महाराज ओळखी शिवाय इतकी सलगी केल्याबद्दल राग करूं नका - एवढें मी विचारतों तेवढें सांगा-

प० शिष्य:— आपण कोण ? व काय विचारणार ?
दु० शिष्य:— महाराज ! मी धनंजयाचार्य नामें एक पंडित येथें आले आहेत त्यांचा शिष्य आहें. मला त्यांनी राजवाड्यांत एक पत्र पोंचविण्यास पाठविलें आहे. तर आपण मला राजवाड्याचा मार्ग दाखवा.
प० शि०— ( मनांत ) आमचे गुरुजी देखील काल बोलत होते खरे कीं, एक नवा कवि आला आहे म्हणून. ( उघड ) तुमच्या गुरूनें कसलें पत्र दिलें आहे पाहूं.
दु० शि०— हें पत्र. ( त्याजवळ पत्र देतो. )
प० शि०— ( मनांत वाचतो ) " स्वस्तिश्रीमन्महाराजाधिराज भोजराज यांस:— आशीर्वाद विशेष. आपले कारभाऱ्यांनी दिलेले सर्व कवींचे ग्रंथ आम्ही पाहिले. त्याबद्दल आमचा जो अभिप्राय आहे तो खालील श्लोकांत दर्शवितों. श्लोक—*अपशब्द शतं माघे, भारतेच शतत्रयं ॥ कालिदासे न गण्यंते, कवावेको धनंजये ॥—इत्यलं " ( मनांत म्हणतो ) अरे हा

---

* अर्थ—माघ कवीच्या ग्रंथांत १०० अपशब्द आहेत, भरत कवीच्या ३०० आहेत व कालिदासाच्या काव्यांत किती अपशब्द आहेत त्यांची गणनाच नाहीं. परंतु धनंजय कवीच्या ( माझ्या ) काव्यांत वरील चरणांत आलेला तेव दाच काय तो एक अपशब्द आहे.

तर केवळ गर्वाचा पुतळा दिसतो ! असो ह्यास अशाच रीतीनें फसविलें पाहिजे. ( उघड ) अहो भटजी , चला मजबरोबर तुम्हास राजवाडा दाखवितो - ( दोघे जातात. )

२रें स्थळ :— कालिदासाचा वाडा , तिथे शिष्य येतात.

प० शि०— ( एकीकडे वळून ) मित्रा गाळवा ! हा पहा मला एक धनंजयाचा शिष्य भेटला आहे , व त्याजवळ हें एक पत्र आहे , तें त्याचे गुरूनें राजास देण्याकरितां त्याजकडे दिलें होतें ; तें मोठ्या चमत्कारानें मला मिळालें -

तिसरा :— ( त्याचे हातून पत्र घेऊन वाचून ) अरे हें गुरुजीस दाखविलें पाहिजे - हें तुला कसें मिळालें ?

पहिला :— ( त्याचेकडून पत्र घेऊन ) मी फुलें घेऊन येत असतां या मनुष्यानें मला तें दाखविलें - नंतर फुलें गुरुजींकडे पोंचवून तुला हा मजकूर कळविण्याकरितां आलों.

दुसरा :— मित्रांनो ! मला राजवाड्याचा मार्ग दाखवितां ना ?

पहिला :— होय ! थोडा वेळ थांब -

तिसरा :— दे इकडेस तें - मी लवकर गुरुजीस दाखवून आणितों -

पहिला:— अरे थांब, गुरुजीस दाखविण्यास जाऊं नको. कारण ते थोर मनाचे आहेत, ते याचा विचार केव्हांही करणार नाहींत. तर आपणच याचा प्रतिकार करूं.

तिसरा:— तूं काय करणार तें सांग तर पाहूं.

पहिला:— (त्याचे कानांत सांगतो) असें करितों म्हणजे त्याची खोड मोडली कीं नाहीं? मग उलटे त्याचेच दांत त्याचे घशांत शिरतील.

तिसरा:— बरें वाः फार चांगली युक्ति!

पहिला:— (पडदाचे आंत जाऊन परत येतो) गाळवा! तर तूं या मित्रास पोंचविण्यास जा. त्याला राजवाड्यापर्यंत रस्ता दाखव आणि परत ये. (पत्र धनंजयाच्या शिरस्त्याजवळ देतो. ते दोघे निघून जातात इतक्यांत पडद्यापलिकडे कोणी हांक मारितो) अः! मला गुरुजी बोलावीत आहेत असें वाटतें (निघून जातो.)

## स्थळ ४ थें— राजाची गोष्टी शाळा.

(राजा, त्याचे दोन तीन मित्र व कांहीं चाकर येतात.)

(भालदार द्वाराबाहेर उलकारतो)

प० मित्र:— कोण आहे रे? का पुकारतोस?

भाल० _ महाराज ! धनंजयाचार्यांचा शिष्य आला आहे, तो सरकारची भेट घेण्यास इच्छितो.

प०मित्र० _ त्याला आंत घेऊं दे. ( शिष्य आंत येतो. )

शिष्य _ राजा विजयी हो. हें आमच्या गुरूंनीं एक पत्र दिलें आहे.

राजा _ ( पत्र घेऊन ) पोंचलें जा आतां. ( तो जातो. राजा फोडून वाचतो आणि म्हणतो ) अरे हा तर फार मंदिष्ट दिसतो. पहा कीं गर्वाच्या भरांत यानें शुद्धाशुद्ध विषयीं देखील कांहीं विचार केला नाहीं. या एकाच पद्यांत किती चुका आहेत पहा !! असो. सभेंत गेल्यावर याचा विचार करूं. मित्रांनो, आतां माध्यान्ह कालाची वेळ झाली तर चलावें. ( सर्व उठतात. )

राजा _ अरे मंजीरका, होमशाळेचा मार्ग दाखीव.

कंचुकी _ असें असें चलावें महाराज. ( सर्व जातात. )

स्थळ ५ वें _ कालिदासाचा वाडा.

( कालिदास व दोघे शिष्य येतात. )

कालि० _ अरे गालवा, काय रे सभाशीं बोलत होतास? कोणाचें पत्र दाखवित होता ?

गालव:- गुरुजी! पैलवानें मघाशीं त्या श्लोकांत ( कानांत सांगतो- ) असा फेरफार केला-

कालि०- कोणचा श्लोक?

गालव:- धनंजय कवीनें एक श्लोक करून त्यांत इतर कवींची व विशेषेंकरून आपली फार निंदा केली आहे व तो श्लोक एका पत्रावर लिहून तें तो राजाकडेस पाठवीत होता, पण तें राजास पोंचण्यापूर्वीच पैलवास मिळालें-

कालि०- आतां तें राजास पोंचलें असेल काय?

गालव:- होय-मीच धनंजय याचे शिष्याबरोबर जाऊन त्याला राजवाडा दाखवून आलों- तो तें राजाजवळ देऊन परतही गेला असेल-

कालि०- ( मनांत ) वा:! ईश्वर तरी किती न्यायी आहे! पहा कीं जो दुसऱ्याची अपकीर्ति करण्यास इच्छितो त्यास आपोआपच शासन होतें- ( उघड रागानें ) पैलव कोठें आहे रे? त्यास हांक मार पाहूं-

गालव:- ( इकडे तिकडे पाहून ) अं! तो आतां इकडे आला होता, इतक्यांत कोपीकडे गेला- ( मनांत)

गुरुजी रागें भरतील म्हणून कदाचित लपाला असेल- ( उ- घड ) अरे पैलवा!

( पडद्यांत — " ओ!! आलों रे " पैलव व त्याजबरोबर एक गरीब ब्राम्हण येतो )

**पैलव.**— अहो गुरुजी! हे एक अति दरिद्री ब्राम्हण आले आहेत- आपल्या भेटीची इच्छा करितात-

**कालि.**— ( मनांत ) अरे, मी ज्यावर रागें भरणार तो हा कांहीं निराळ्याच बहाण्यानें येत आहे; तर यावरून ईश्वरास ही गोष्ट रुचली असावी असें वाटतें- असो- तर आतां- ज्यापेक्षां तोच ( धनंजय ) आपल्या हातानें आमची अपकीर्ति करण्यास प्रवृत्त झाला त्यापेक्षां त्याचा प्रतिकार अवश्य केला पाहिजे, आणि त्याच संधीस हा ब्राम्हणही आला आहे तेंव्हां तो देखील आपल्या उपयोगी पडेल- ( उघड ) अरे, आण त्यास इकडे-

**ब्राम्हण.**— ( पुढें येऊन व साष्टांग नमस्कार करून ) महाराज! मी अति दरिद्री आहें, आपली कीर्ति ऐकून आलों आहें- पण या उज्जयनी नगरांत असे अनेक ब्राम्हण आढळतील कीं, आपल्या कृपेनें ज्यांनें [illegible] द्रव्य [illegible]-

यास जाऊन ते आनंदानें सहकुटुंब वास करीत आहेत, व ही कीर्तिही तुमची दिगंतरीं पसरली आहे. तर महाराजमलाही कांहीं मिळेल असें कराल व माझें दारिद्र्य नाहींसें कराल तर मोठे उपकार होतील. महाराज! येथील राजसभेंत नवा श्लोक करून नेला असतां त्याबद्दल लक्ष संख्य निष्क मिळतात पण तेथें नेलेला श्लोक नवा ठरण्याची पंचाइत; कारण तेथील एक पाठी पंडित तो लागलाच पाठ म्हणून दाखवितात. तर आस कांहीं युक्ति सांगून मला या दारिद्र्यदुःखांतून सोडवाल तर मोठे उपकार होतील.

कालि०— भटजी महाराज! आपणास एक युक्ति सांगतों. आपण राजाकडेस जो श्लोक रचून आणाल त्यांत ( त्याचे कानांत सांगतो ) असा अर्थ आणा म्हणजे तुमचें काम फत्ते होईल.

ब्राम्हण— ( आनंद पावून ) वाहवा वाहवा!! चांगली युक्ति सांगितली महाराज!

कालि०— ( मनांत ) पण ह्यामुळें आमच्या प्रतिज्ञेप्रमाणें सन्यास घ्यावा लागेल, तर यास काय युक्ति करावी बरें? ( विचार करून ) ओहो!! फार चांगली युक्ति आ-

98544

ठवली, आतां कांहीं चिंता नाहीं. (उघड) भटजी महाराज! आज दुपारीं आपण सांगितलेल्या तयारीनें कचेरीस या बरें?

ब्राह्मण:— होय महाराज! (नमस्कार करून) येतों आता (निघून जातो)

कालि०— अरे पैठवा! अरे गालवा! मध्यान्हाहुतीची वेळ झाली तर चला, होमशाळेंत तयारी करा. हा मी येतों. (निघून जातात)

(पडदा पडतो.)

॥ इति युक्ति निरूपणो नाम द्वितीयों ऽकः ॥

---

अंक तिसरा.

पहिलें स्थळ:— राजाचें दरबार. कालिदासादि नऊ कवि, धनंजय, दिङ्नागाचार्य, प्रधान, आणि सपरिवार राजा हे प्रवेश करितात.

(भालदार "राजाधिराज भोजराज" इत्यादि पुकारे म्हणतो)

(सर्व आपापल्या स्थानीं बसतात.)

धनं॰ ( मनांत ) आतां राजेसाहेब माझी मोठी वाहवा करून कालिदासाची चांगली फजिती करितील. मग त्याचें जें येवढें देवतार्चन मांडलें आहे तें पार नाहींसें होईल. ( राजाकडे पाहून किंचित् हास्य करितो. )

राजा:— ( मनांत समजून ) हे सभाजन हो! ह्या दरबारीं नूतनच आलेले कवीश्वर धनंजयाचार्य यांणीं येथील सर्व कवींचे ग्रंथ वाचून त्यांबद्दल त्यांचा जो अभिप्राय आहे तो आम्हांकडे पाठविला आहे. तर तो सर्वांस कळावा म्हणून हे प्रधान आतां वाचतील त्याजकडे सर्वांनीं अवधान द्यावें.

प्रधान:— ( राजाजवळून पत्र घेऊन वाचतो. ) " स्वस्तिश्री भोजराज महाराज॰ ( इत्यादि पूर्वोक्त वाचल्यावर ) " आपशब्द शतं माघे, भारवेच शतत्रयं ॥ कालिदासे न गण्यंते, कवावेको धनंजये ॥ ( हा श्लोक ऐकून सर्व हंसतात. )

धनं॰ ( म्लान वदन होऊन मनांत ) नजर चुकीनें ' अपशब्द ' ह्या ठिकाणीं ' आपशब्द ' पडलें असावें. अरेरे घात झाला !! ( पश्चात्तापानें ) महा दुसऱ्याची फजिती करण्यास गेलों तर माझीच बेकेरी उडाली.

राजा:— प्रधानजी !. ह्या सभेंत सर्व ज्ञाते असल्यामुळें त्यांस या श्लोकाचा अर्थ समजलाच असेल पण जे प्राकृत जन असतील त्यांसही समजण्याकरितां तो प्राकृत वाणीनें सांगा.

प्रधान:— हे सभाजन हो ! ह्या श्लोकांत अशुद्धें तर पुष्कळच आहेत, पण त्यांविषयीं न बोलतां या श्लोकाचें तात्पर्य मात्र सांगतों, तर सावधान ऐका - हे धनंजयाचार्य म्हणतात कीं " माघ काव्यांत पाण्याचे वाचक शब्द शंभर आहेत, भरत कवीच्या काव्यांत तीनशें आहेत व कालिदासाच्या काव्यांत किती आहेत ह्याचा अंतच नाहीं. पण धनंजय कवीला मात्र " आप " एवढा एकच शब्द माहित आहे, आणखी कांहीं नाहीं." ( सर्व सभासद पुनः हंसतात. ) ( धनंजय खालीं मान घालून बसतो.)

राजा:— ( त्याजकडे पाहून ) पण सभ्यजन हो ! येथें ही त्यांच्या नजर चुकीची गोष्ट आहे, हें उघड दिसतें. त्यांचा उद्देश " आपशब्द या ठिकाणीं " अपशब्द " असें म्हणावयाचा होता, असें स्पष्ट आहे म्हणून सूज्ञास-त्यांचा उपहास करणें बरोबर नाहीं. ( इतक्यांत भालदार ललकारतो )

राजा:— प्रधानजी, कोण आहे. चौकशी करा.

प्रधान:— भालदार! कां पुकारतोस?

भाल०— महाराज! एक कवि दरबारची भेट घेण्यास इच्छित आहे. आंत येण्यास परवानगी मागतो.

प्रधान:— त्यास आंत आण.

भाल०— आज्ञा महाराज.

धनंजय:— राजाधिराज! आपण म्हणतां तोच हेतु होता व चुकीचें कारणही आपण बरोबर ताडलें. आपले एकेक गुण किती म्हणून वर्णावे! आपण संपादिलेली ही मोठी धनुर्विद्या खरं अपूर्वच आहे. पहा कीं—

( श्लोक )

॥ अपूर्वेयं धनुर्विद्या, भवता शिक्षिता कुतः ॥
॥ मार्गणौघः समभ्येति, गुणो याति दिगंतरं ॥

( अर्थ— हे राजा! ह्या अपूर्व धनुर्विद्येचा अभ्यास तूं कोणाच्या ठिकाणीं केलास? ज्या विद्येच्या योगानें मार्गणौघ ( बाणांचा समुदाय पक्षीं याचकांचा समुदाय ) तुजकडे येतो, आणि गुण ( धनुष्याची दोरी पक्षीं कीर्ति ) दिगंतरीं जातो.)

राजा:— शाबास! शाबास!! कविराज, आपणाविषयीं आमची खात्री झाली. (कवीसह भालदार येतो.)

कवि:— विजयस्व राजन विजयस्व.

राजा:— महाराज, आपलें वास्तव्य कोठें, नांव काय, व आम्हास दर्शनाचा लाभ किन्निमित्त दिला हें समजण्याची फार उत्कंठा आहे.

कवि:— तुझी कीर्ति या भूमंडळावर भागीरथीप्रमाणें पसरली आहे. तुझी लीनता तर कांहीं अपूर्व आहे! राजा! मी चंदनपूरचा रहाणारा, माझें नांव सूर्य कवि मी आपल्या सभेस सादर करण्याकरितां एक श्लोक आणिला आहे, आज्ञा झाल्यास म्हणून दाखवितों.

राजा:— महाराज, म्हणावा. आपणांस कांहीं अडथळा नाहीं.

कवि:— (श्लोक म्हणतो)

स्वस्ति श्रीभोजराज! त्रिभुवन विजयी धार्मिकः सत्यवादी ॥ पित्राते सूर्य सूरैर्विबलि परिमिता रत्न कोट्यो गृहीताः ॥ तास्त्वं देहीति राजन्सकल कविवरै ज्ञातमेसत्यमेतत — लोका जानंति चैषाकृतिगपिहु नवा देहि

लक्षंच तद्गोः ॥ ( अर्थ- हे भोजराज! तूं त्रिभुवनें जिंकणारा असा महा पराक्रमी, स्वधर्मनिरत आणि सत्यवादी असा आहेस. तुझ्या पित्यानें सूर्य कवीच्चीं ( म्हणजे माझीं ) नव्वद कोटी रत्नें घेतलीं आहेत तीं तूं दे. ही गोष्ट तुझ्या सभेंतही कित्येकांस माहित असेल, जर त्यांस माहित नसली तर हा माझा श्लोक नवा ठरला म्हणून मला सवा लाख सोन्याचीं नाणीं आपल्या प्रतिज्ञेप्रमाणें दे )

( हा श्लोक ऐकून सर्व सभासद त्यांतही मुख्यत्वें एकपाठी नऊ कवि ( कालिदासाशिवाय ) आश्चर्यानें चकित होऊन स्तब्ध राहतात. कोणी देखील तो पाठ म्हणून दाखवीनात. )

**कालि०** ( आनंद पावून मनांत ) आतां खास ब्राह्मणाचें कल्याण होईल.

**न्याय०** राजाधिराज! आतां हा श्लोक नवा ठरला म्हणून या ब्राह्मणाची योग्य संभावना होऊन पाठवणी व्हावी.

**राजा** त्यांची पाठवणी नाहीं करावयाची, त्यांस आम्ही आपल्या कविवृंदांत ठेवणार. प्रधानजी, यांस सवा लाख सोन टाका व पंचमहा वस्त्रात्मक पोषाक द्या व त्यांचें

रहाण्याची नीट व्यवस्था ठेवा. वाः! आज पुष्कळ दिवसांनीं ह्या सभेंत नवा श्लोक असें ठरलें.

**प्रधान:—** आज्ञेप्रमाणें करितों. (दोघे जातात.)

**धनंजय-दिङ्नागाचार्य:—** (मनांत) अरे आतां प्रतिज्ञेप्रमाणें आम्हास सन्यास घेतला पाहिजे. बरें असो. आम्हाबरोबर कालिदासही आहे तो सन्यासी झाला तर आम्ही होऊं.

**न्याय॰—** राजाधिराज! ह्या सभेंत झालेल्या प्रतिज्ञेचें आपणास स्मरण आहे ना? या त्रिवर्ग कविश्रेष्ठांनीं आतां त्याप्रमाणें वागलें पाहिजे.

**राजा:—** (स्मरण झाल्यासारखें करून) होय होय, खरोखरच वागलें पाहिजे, त्याप्रमाणें ते वागतीलच, अनमान करणार नाहींत, कारण थोरांचे मुखांतून आलेलें भाषण कधीं मिथ्या व्हावयाचें नाहीं. (मनांत) अरेरे! पण कालिदासारखें रत्न आतां आपल्या हातून जाणार ही मोठ्या दुःखाची गोष्ट आहे.

**कालि॰, दिङ्ना॰, धनं॰—** आम्ही सन्यास घेण्यास कबूल आहों.

राजा:— तर न्यायाधिशा! तुम्ही व प्रधानजी मिळून यां-ची काशीस जाण्याची तयारी करून द्या.

न्याय०— आज्ञा महाराज! सर्व तयारी यथास्थित करून देतों. ( जातो ) ( पडद्यांत स्तुतिपाठक स्तुति करितात. )

पहिला:— ( श्लोक. )

जो क्षीर[1]धींत शयना करि नाग[3]पृष्ठीं ॥ लक्ष्मी जयां नि-रखि संतत[4] लोल-दृष्टी ॥ तो शेषशायि[6] भगवान्स्वयमेव तूतें ॥ रक्षो नृपा सतत दानृ[7]जन प्र[8]भूतें ॥ ( १ क्षीर समुद्रांत. २ निद्रा. ३ शेषाचे पाठीवर. ४ सदोदित. ५ चं-चलाशी. ६ शेषावर निजणारा. ७ दाते लोक. ८ राजातें. )

दुसरा:— ( श्लोक.

जो का वृषध्वज[1] वसे सतत स्मशानीं ॥ जो रक्षितो वि भ-क्तैकां[3] अपुल्या निदानीं ॥ तो पार्वती[4]सुरनदीफणिबाल-चंद्रा— ऽऽक्रांत[5] स्वदेह तुज रक्षु सदा नरेंद्रा ॥ ( १ वृ-षाचें म्हणजे बैलाचें चिन्ह आहे ज्याचे ध्वजावर असा महा-देव. २ मसणवटांत. ३ भक्तांस. ४ पार्वती, सुरनदी म्ह० गंगा, फणि म्ह० सर्प, बालचंद्र म्ह० चंद्राचीकळा यांणीं आक्रां-त म्ह० व्यापिलेला आहे देह ज्याचा असा शंकर. ५ ( रक्षो. )

तिसरा:— ( श्लोक )

हा सूर्य आक्रमुनि हें नभ थोर सारें ॥
अस्तास जाय तंव शोभतसे कसा रे ॥
घेऊनि राज्यभार तूंहि जसा दिनांतीं ॥
होसी प्रभो असुनि ईषदलक्त-कांती ॥

( १ चालून. २ दिवसाचे शेवटीं. ३ ईषत् = किंचित्
अलक्त = अळता, लाल, कांति = वर्ण ज्याचा असा )

राजा:— सूर्यास्ताची वेळ झाली. प्रधानजी आतां स-भा बरखास्त करावी.

( चोपदार ललकारतो, सर्व उठतात. पडदा पडतो. )

॥ इति काशिकापूर प्रस्थानो नाम तृतीयोऽङ्कः ॥

---

## अंक चवथा.

### प्रवेश पहिला — गंगेचा घाट — काशी.

( तिघे शिष्य व तिघे ब्राम्हण येतात. नंतर पंडित. )

प० शिष्य:— लवकर चलावा! आतां गुरुजी येतील. लवकर लवकर स्नान करून धोतें पूजेची तयारी केली-पाहिजे

दु॰ शि॰ पैलवा! गुरुजी खरेंच काय रे सन्यास घेणार? मला ह्या सर्व गोष्टी स्वप्नवत वाटत आहेत, आणि अगदीं चैन पडत नाहीं.

प॰ शि॰ अरे खरेंच घेणार हो. तिघांनीं राजदरबारीं केलेल्या प्रतिज्ञा खोट्या कशा होतील.

( तिघे ब्राम्हण त्याचा वरील संवाद. एकमेकांकडे पहातात. )

प॰ ब्रा॰ रामभटजी! हे दोघे काय बोलत आहेत हें तुम्हीं ऐकिलें काय?

दु॰ ब्रा॰ होय. कोणास सन्यास देण्याच्या गोष्टी बोलतात नीट चौकशी करा बरें पाहूं. कांहीं दक्षणेचें संधान असलें तर बरेंच झालें.

प॰ ब्रा॰ अरे मुलांनों! तुम्ही कोणास सन्यास देण्याविषयीं गोष्टी बोलत आहां?

प॰ शि॰ भटजी, आमचे गुरु कालिदास आणि दुसरे दोन पंडित हे आपापल्या प्रतिज्ञेप्रमाणें ऐसें सन्यास घेण्यास आले आहेत. आम्हीं दोघे त्यांचे शिष्य आहों.

प० ब्रा०_ सखारामभट! कांहीं संधान आहे हो आहे. तीन पंडित सन्यास घेणार आहेत असें कळतें.

ति० ब्रा०_ राम भट! आमची आठवण असूं द्या हो-नाहीं तर आमच्याच पोळीवर तूप ओढाल.

प० ब्रा०_ धोंड भटजी! तुम्ही उगाच निंदा करितां-मी तुम्हांस कधीं तरी वगळतों का हो? (मुलांस) मुलांनों तुमचे गुरु कोठें उतरले आहेत?

प० शि०_ येथून जवळच चंद्रकांताच्या धर्मशाळेंत.

ति० ब्रा०_ अहो राम भट! ए सखाराम भट! चला त्यांस भेटून जाऊं. नाहीं तर दुसराच कोणी शिकार साधील. (तिघे ब्राम्हण जातात.)

ति० शि०_ ही बातमी मी आपल्या स्वामीस जाऊन कळवितों, कारण त्यांनी मला त्याच शोधास पाठविलें होतें. (जातो.)

प० शि०_ (गंगेकडे पाहून) गालवा! ह्या गंगेचें पाणी किती स्वच्छ आहे पहा. सज्जनाच्या मनास गंगाजळाची उपमा देतात ती यथार्थ आहे. या पाण्यांत असंख्य नक्र, मत्स्य मगर, कांसव वगैरे क्रीडा करीत आहेत, हिच्या तिरावर वृक्ष-तरी काय दाट लागून गेले आहेत, तशींच हजारों देवाळयें

व चांद शोभत आहेत. त्या घाटांवर अनेक तपस्वी शुभ्र वस्त्रें वाहून घालून व हाती रुद्राक्ष माळा घालून ध्यानस्थ बसले आहेत, कित्येक वेताच्या करंड्या जवळ घेऊन व गोमुखीत हात घालून जप करीत बसले आहेत, कित्येक आपल्या जटा वटक्षिरानें मुकुटावर बांधीत आहेत, कांहीं दर्भ, समिधा-हातांत घेऊन लगबगीनें जातयेत आहेत, कित्येक वेदांवि-षयीं, शास्त्राविषयीं चर्चा करीत आहेत अशा अनेक गड बडींत रोज असल्यामुळें सर्व तीर कसें गजबजून गेलें आ-हे. ( वर आकाशाकडे पाहून ) अरे दिनराज तरी किती वर आला हा! शिष्या, कर कर लवकर स्नान. ( दोघे स्नान करून जातात. )

दुसरें स्थळ — विश्वेश्वराचें देवालय, एक संन्यासी येतो.

संन्यासी:— आतां या ज्ञार! त्या पंडितांना बोलावण्याक-रितां पाठविलें आहे. ते येत तोंपर्यंत येथेंच अभय विश्रां-ति घ्यावी. ( इकडे तिकडे फिरतो )

( तिघे पंडित, त्यांचे शिष्य व आणखी कांहीं संन्यासी येतात. )

पं०अ०— नारायण!! कां ठीक आहे ना निवृत्तिनाथ?

**दु०स०**— विश्वेश्वरान्च्या कृपेनें अद्यापपर्यंत आश्रमधर्म सुरक्षित चालला आहे.

**धनंजय**— ( औदासिन्यानें ) स्वामी महाराज ! आम्हांस ह्या क्षणिक नरतनूच्या ग्रासांतून सोडवून अद्वैतामृत पाजण्याची कृपा करा.

**ति०स०**— नारायण !! अहाहो !! नमस्तस्मैब्रम्हणे !![1] ब्रम्हानंद किती म्हणून सुखकारक सांगावा !!

**प०स०**— आतां तुम्ही एकेक जण प्रथम भागीरथींत स्नान करून या, व सर्व संसारविषयक वासनांचा मनःपूर्वक त्याग केला असें त्रिवार वचन द्या, आणि धन, पुत्र, दारा, आप्त, गण, गोत हीं माझीं कोणी नव्हेत व आतां यांचा माझा कांहीं संबंध नाहीं म्हणून मनःपूर्वक शपथ करा म्हणजे तुम्हांस दीक्षा देतों. घाटावर दीक्षा देण्याची सर्व तयारी करून ठेविली आहे.

**धनंजय**— मी सर्वथा तयार आहें. ( स्नान करून येतो. )

**प०स०**— आतां तुम्ही कोणाचें ध्यान करणार तें प्रथम सांग.

**धनं०**— शंकराचें महाराज !

---

१ ब्रम्हास नमस्कार असो.

## ( श्लोक )

सदा ऽ हं साकेते विमल शरयूतीरपुलिने ॥ चरंतं-श्रीराम सकल विबुधैः सेवित पदं ॥ अये राम स्वामिन्जनकतनयावल्लभ विभो ॥ प्रसीदे त्या क्रोध निमिषमिव नेष्यामि दिवसान् ॥ ( अर्थः- अयोध्येमध्यें शरयू नदीच्या स्वच्छ वाळवंटांत विहार करणारा, सर्व देवांस वंद्य असा जो श्रीराम त्याचें सर्वदा ध्यान करून हे रामचंद्रा ! हे जानकीपते ! हे प्रभो ! मजकर प्रसाद कर अशी ध्यासानें सर्व दिवस निमिषाप्रमाणें चालवीन.)

अपरञ्च श्रुणु। विसृष्टो ऽ यं संसारपाशा, गृह धनदारापुत्रपौत्रादि सकलमपि क्षणभंगुर विनाशिञ्च । कित्येकं परं ब्रम्हैवाविनाशि, तद हे रामस्वरूपेण ध्यात्वा, अचिरादे वेमांक्षण विनाशि ननुं परित्यक्तुं कायवाङ्मनोभिर्निग्रहः कृत, तत्प्रसादयमां चतुर्थाश्रम धर्मेण दीक्षापितुम्।

( अर्थः- आणखी ऐका- हा संसारपाश सोडला, गृह धन स्त्रीपुत्र नातवंडें इत्यादि सर्व क्षणांत नाश पावणारीं आहेत परंतु एक श्रेष्ट ब्रम्ह मात्र अविनाशी आहे तें मी रामस्वरूपानें ध्यानीं धरून लवकरच या क्षणांत नाश पावणा-

ज्या तनूचा त्याग करण्याविषयीं कायावाचामनेंकरून निश्च-
य केला आहे तर मला संन्यासदीक्षा देण्याची कृपा करावी.)

**प.स.** साधु साधु, अनुवर्तस्व* मां गंगातीरं. (दोघे जातात)

**दु.स.** आतां कोण स्नान करितो. (दिङ्नागाचार्यास) आतां आपण उठावें.

**दिङ्ना.** होय स्वामी महाराज! (स्नान करून येऊन हात जोडून) अहंतु कृष्णारूपिणि ब्रम्हणि मनोनियुज्य निवसामि । कथं भूतं कृष्णास्वरूपं तच्छृणु –

(श्लोक)

सदा वृन्दारण्ये विमल यमुनातीरपुलिने ॥ चरंतं श्रीकृष्णं हलधर सुदामादिसहितं ॥ अये कृष्णा स्वामिन्मधुर मुरलीवादनपटो ॥ प्रसीदे त्या क्रोशन्निमिषमिव नेष्यामि दिवसान् ॥

(अर्थः– वृंदावनांत यमुना नदीच्या स्वच्छ वाळवंटांत बलराम सुदामा इत्यादि सवंगड्यांसह विहार करणारा असा जो श्रीकृष्ण त्याचें सदोदित ध्यान करून हे कृष्णा!

---

* फार योग्य मजबरोबर गंगातीरीं चला. कं. मी तर कृष्णारूपी ब्रम्हाचे ठिकाणीं मन ठेवून राहीन तें कृष्णास्वरूप कसें तें ऐक-

हे मुरलीवादनकुशळा! मजवर प्रसाद कर अशा ध्यासानें स-र्व दिवस निमिषाप्रमाणें घालवीन.)

अपरंच। त्यक्तोऽयं दुःखदः संसारः, यस्मिन्सर्वत्रापि-दुःखालिंगितं, सुखं अनुभूयते, तर्हि तद्दुःखावच्छिन्नं सुखं परित्यज्य, एकं ब्रम्हानंदसुखं अनुभवामि। त-च्छीघ्रं श्रीमदार्यैः प्रसादः कार्यः। (अर्थः– आणखी, हा दुःख देणारा संसार सोडला, ज्यांत सर्वत्र दुःखानें व्यापि-लेलें असें सुख अनुभवास येतें म्हणून तें दुःखमिश्रित सुख सोडून एका ब्रम्हानंद सुखाचाच अनुभव मी घेईन तर लवकर महाराजांनीं कृपा करावी) (त्यासह जातो.)

**ति०स०**— कालिदास! आतां आपण स्नान करून यावें.

**कालि०**— हा मी सिद्ध आहें. (स्नान करून येतो)

**ति०स०**— आपण कोणाच्या ध्यानांत कालक्षेप करणार?

(इतक्यांत सन्यासी धनंजय व दिङ्नागाचार्य येतात.)

**धनं०**— नारायण!! अजून नाहीं का कालिदासास स-न्यास दिला? (पुढें पाहून) हं हं अरे तो शपथ करी-त आहेसें वाटतें.

**कालि०**— मी तर — (श्लोक)

सदा कांतागारे परिमळमिळत्पुष्पशयने ॥ ( अर्थ:— ज्यांत सुवासिक पुष्पांची शय्या घातली आहे अशा सुंदर स्त्री-च्या रंगमहालांत ) ( ऐकून सर्व लोक विस्मित होतात )

दो०सं०— ( कानावर हात ठेवून ) नारायण ! नारायण !! ह्याच्या विषयवासना अद्यापि तृप्त झाल्या नाहींत , तर हा कसना सन्यास घेतो ! आम्ही यास दीक्षा देणार नाही.

( धनंजय व दिङ्नागाचार्य ती गडबड ऐकून जवळ येतात. )

कालि०— ( दुसरा चरण म्हणतो )

शयानः कांतायाः कुचयुग महं वक्षसि वहन् ॥ ( अर्थ:— त्या सुंदरीचे स्तनद्वय आपल्या वक्षस्थळीं धारण करून )

धनं, दिङ्ना०— अंहह[1] !! हतास्म[2] हतास्म !!! वंचितावयं[3] !

कालि०— ( तिसरा चरण— )

अयि स्निग्धे मुग्धे कुटिलनयने चारुवदने ॥ ( अर्थ:— हे प्रिये ! हे सुंदरी हे सुभ्रू हे सुवदने )

( धनंजय व दिङ्नागाचार्य क्रोधानें चवताळून त्या सन्यासी व गुरुपत्नी कालिदासास दंडानें मारण्या करितां धावून जातात )

---

१ अरेरे. २ आमचा नाश झाला. ३ आम्ही फसलों.

**दोघेस०**— ( विस्मयानें ) अरे ह्यांचा देखील अजून हा तामसी स्वभाव सुटला नाहीं- हर हर!! यांची सर्व दीक्षा व्यर्थ गेली- ( त्यांस निवारितात )

**कालि०**— ( चवथा चरण म्हणतो )

प्रसीदेत्या क्रोशान्निमिष मिव नेष्यामि दिवसान् ॥ ( अर्थः- प्रसाद कर असा ध्यास करून सर्व दिवस निमिषाप्रमाणें चालवीन )

( धनंजय व दिङ्नागाचार्य निवारण केल्यामुळें चवताळून शाप देण्याकरितां कमंडलूतील उदक ओंजळींत ओतून घेतात )

( इतक्यांत पडद्यापलिकडे मोठा कडकडाट होऊन शब्द होतो ) " अलमलं[1] साहसेन "

( नंतर तो शब्द ऐकून सर्व साश्चर्य व सविस्मय पहातात तों पुढें भूतगण असून वृषभारूढ होत्साते पार्वतीपरमेश्वर येतात ) ( सर्व साष्टांग नमस्कार करितात- )

**पार्वतीपरमेश्वर**:— हे प्रियभक्ता! तुझ्या दृढतर भ-

---

१ हं हं साहस पुरे.

त्तीनें व बुद्धिवैभवानें आम्ही संतुष्ट झालों नर वर माग-

**कालि०**— (साष्टांग नमस्कार करून) हे जगत्सर्ग स्थिति-प्रलयकारका! हे अष्टमूर्ति धारिन्! हे जगत्प्रभो! हे भक्तवत्सला! आपली कृपा या दासानुदासावर असली म्हण जे मग झास कांहीं कमी नाहीं. पण ज्या अर्थी प्रभु वरमाग म्हणतात त्या अर्थी हा वर मागतों कीं हे दोन पंडित श्रेष्ठ प्रभूंच्या कृपेस पात्र होऊन अंतीं यांस ब्रम्हपदाची प्राप्ति व्हावी.

**पार्वतीपरमेश्वर**— तथास्तु. आणखी तुझी कोणती इच्छा आहे?

**कालि०**— आणखी कांहीं नाहीं तथापि इतकें असो—

## भरतवाक्य-

पर्जन्योऽस्मिन्जगति महतीं वृष्टिमिष्टां विधत्ताम् ॥
राजानः क्ष्मांगलित विविधो पप्लुवाः पालयंतु ॥
तन्दोन्मेषो पहत तमसस्त्वत्प्रसादान्महांतः ॥
संसाराब्धिं विषय ममता तंक पंकं तरन्तु ॥

(अर्थः— पृथ्वीवर सर्वत्र सुवृष्टि होवो, राजे उपद्रवरहित होतसाते पृथ्वीचें पालन करोत, आणि तुमच्या प्रसादानें

महात्मे साधु अज्ञानरहित होत्साते आनंदाने संसारसमुद्र तरून जावोत. )

पार्वती परमेश्वर :— तथास्तु.

( पडदा पडतो. )

॥ इति पार्वती परमेश्वर प्रसादो नाम चतुर्थो ऽ कः ॥ समाप्तश्चायं ग्रंथः ॥

॥ समाप्तः ॥

---